**राष्ट्रीय बालकामगार प्रकल्प योजनेची प्रभावी व कार्यक्षम अंमलबजावणी होण्यासाठी राज्यस्तरीय देखरेख समितीची स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. सीएलए-२०१६/प्र.क्र.११२/कामगार-४,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १८ फेब्रुवारी, २०१७

**प्रस्तावना :-**

बालकामगार प्रथेचे समुळ उच्चाटन करण्याकरीता केंद्र शासनाच्या श्रम व रोजगार मंत्रालयाने दि. २१ मार्च, २०१६ च्या पत्रान्वये राष्ट्रीय बालकामगार प्रकल्पासदर्भात (NCLP) सुधारीत मार्गदर्शक तत्वे निर्गमित केली आहेत. सदर मार्गदर्शक तत्वातील परिच्छेद ३.१४ ते ३.१६ अन्वये राज्यस्तरीय देखरेख समिती स्थापन करणे सक्तीचे केले आहे. राष्ट्रीय बालकामगार प्रकल्प योजनेची प्रभावी व कार्यक्षम अंमलबजावणी होण्यासाठी तसेच या अंतर्गतच्या विविध विकास कार्यक्रमांच्या एककेंद्रभिमुखतेकरीता राज्यस्तरीय प्रकल्प समितीची स्थापना करणे आवश्यक आहे. यामुळे, शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या मार्गदर्शनास अनुसरुन राष्ट्रीय बालकामगार प्रकल्प योजनेची प्रभावी व कार्यक्षम अंमलबजावणी होण्यासाठी तसेच या अंतर्गतच्या विविध विकास कार्यक्रमांच्या एककेंद्रभिमुखतेकरीता खालीलप्रमाणे राज्यस्तरीय देखरेख समितीची स्थापना करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | मुख्य सचिव | :- | अध्यक्ष |
| २) | अपर मुख्य सचिव, गृह विभाग | :- | सदस्य |
| ३) | प्रधान सचिव, कामगार | :- | सदस्य |
| ४) | प्रधान सचिव, महिला व बालकामगार विभाग | :- | सदस्य |
| ५) | प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग | :- | सदस्य |
| ६) | आयुक्त, कामगार | :- | सदस्य |
| ७) | उप सचिव, कामगार | :- | सदस्य सचिव |

कामगार विभाग आणि महिला व बाल विकास विभाग एकत्रितपणे राज्यातील बालकामगार प्रकल्पाच्या कामावर लक्ष ठेवतील व कामाचे पुनरावलोकन करतील आणि राज्यस्तरीय देखरेख समितीला मदत करतील. सुटका करण्यात आलेल्या बालकामगार व त्यांच्या कुटुंबियांपर्यत विविध विभागांकडून पुरविण्यात येणाऱ्या सुविधा पोहोचविण्याकरीता राज्यस्तरीय देखरेख समिती शिखर संस्था म्हणून काम करेल. बालकामगार प्रथेचे समुळ उच्चाटन करण्याकरीता करण्यात येणाऱ्या कार्याचा आढावा घेण्याकरीता सदर समितीची वर्षातून किमान एकदा बैठक आयोजित करण्यात यावी. या बैठकांमध्ये संबंधित विभागांच्या सचिवांना तसेच श्रेत्रिय सामाजिक संस्थांना आमंत्रित करण्यात यावे. सदर समिती राष्ट्रीय बालकामगार प्रकल्पाच्या कामकाजाचा देखील आढावा घेईल. केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या सुधारीत मार्गदर्शक तत्वातील तरतूदींनुसार सदर समिती आपले कामकाज पार पाडील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२१८१२१४१२६६१० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shweta Singhal

Digitally signed by Shweta Singhal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7203cea00960f7861c8830030dc18f6cc7205 2ef4c9a2526ed85e04c8004947a, cn=Shweta Singhal
Date: 2017.02.18 12:20:34 +05'30'

**( श्वेता सिंघल )**
उप सचिव (कामगार)

**प्रति,**

महासंचालक, प्रसिद्धी संचालनालय, मंत्रालय, मुंबई या शासन निर्णयाला व्यापक प्रसिद्धी देण्याच्या विनंतीसह.

**प्रतिलिपी :-**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य.
२. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. प्रधान सचिव, कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मुंबई-३२.
६. सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा दंडाधिकारी.
७. आयुक्त, कामगार, मुंबई.
८. आयुक्त, महिला व बालकल्याण विभाग, मुंबई.
९. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१०. सर्व विभागीय आयुक्त.
११. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. उप सचिव, कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. मंत्रालयातील सर्व विभाग.
१४. निवडनस्ती (कामगार-४)